अगदीं अलीकडे म्हणजे इंग्रजांचा अम्मल या देशांत सुरू नुकताच होऊन कोर्टांची व्यवस्था झाल्यावरचे, स्लीमन नामक एका इंग्रजी जज्जाचे पुढील उद्गार वाचा. तो म्हणतोः—

" I have had before me hundreds of cases in which a man's property, liberty, life, has depended upon his telling a lie and he has refused to tell it. "

Sleeman–Judge.

म्हणजे—' मजपुढें हजारों हजार असे खटले आले आहेत कीं, त्यांत जर पक्षकार एक शब्द खोटा बोलेल तर त्याचें घरदार, मिळकत सुटत होती, तो बंधमुक्त होत होता, आणखी काय ? **पण त्याचा प्राण वांचत होता. तथापि त्यानें मिळून खोटें नाहींच सांगितलें.'**

हें अवतरण देऊन, मोक्षमुल्लर साहेब भारतीयांविषयीं एकप्रकारें साभिमान होऊन आपले जातभाईस खोंचून प्रश्न करितात.

" Could many an English Judge say the same ?

म्हणजे अशाप्रकारचें विधान इग्लंडांतील न्याय मंदिरांतील पक्षकारासंबंधें करण्याची छाती कितीशी इंग्रज न्यायाधिशांना होईल बरें ?

भारतीय आर्यहो, हा विचार करा. हें तुमचें सत्यप्रियत्व कोठें गेलें आणि तें गमवून त्याचे बदली तुम्ही काय पैदा केलें ? आम्हाला वाटतें कीं, हल्लींचें अल्पायुत्व, प्लेग, दुष्काळ-परंपरा, इत्यादि अनेक अनिष्ट गोष्टी, यांस आमचें सत्यपराङ्मुख व मलिन आचरणच कारण आहे. कारण, साथीचे रोग, लढाया, भूकंपादि प्रलय असले राष्ट्रीय अनर्थ हे सामान्यपात-कांनीं होत नाहींत. बिझांटबाई म्हणतेः—

' A plague sweeps thousands of the men of a nation. A mighty war scatters its thousands of dead on the field of carnage. Why ? Because that nation had disregarded the divine law of it's growth and must learn its lesson by suffering, if it will not learn it by reason. '

भावार्थः—एखाद्या राष्ट्रांत सांथ येऊन या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हजारों लाखों माणसें घेऊन जाते किंवा एखादें भयंकर युद्ध उद्भवून सर्व रणभूमी प्रेतांनीं भरून निघेसे लाखो बळी पडतात. या गोष्टींतील रहस्य काय ? रहस्य इतकेंच कीं, त्या राष्ट्रानें स्वोन्नती-बद्दल त्याला ईश्वरानें घालून दिलेला कायदा मोडला. आणि ज्या अर्थीं उपदेशाचे शब्दांनीं तें राष्ट्र शुद्धीवर येत नाहीं, त्याअर्थीं आतां दांडके उगारणें हाच उपाय, असें ईश्वरालाहि वाटून तो तसें करितो.

याप्रमाणें पहाल तर तुमचे ध्यानांत आमचे म्हणण्याची यथार्थता तेव्हांच येईल. सत्यपराङ्मुखता ही या आर्यभूमीला विशेषतः विघातक होते. याचें कारण आम्ही पूर्वींच एका उताऱ्यांत सांगितलें आहे. कीं, ' धर्मपालन ' हीच या राष्ट्रास ईश्वरी आज्ञा आहे. धर्मानेंच या राष्ट्राचा उत्कर्ष व्हावा असा ईश्वरी संकेत आहे. आणि सत्य हें धर्माचें उत्तमांग म्हणजे शिर आहे. इतर गुण हे त्याहून कमी प्रतीचे अवयव म्हटलें तरी चालेल आणि तें सत्य, तें शिरच, जर तुटलें, तर मग अनेक अनर्थ ओढवावे, यांत काय नवल ?

असत्य, कपट, छलवाद, यापासून केवढे अनर्थ होतात याचें उदाहरण प्रत्यक्ष भागवतांतच

आहे. साक्षात् श्रीकृष्णाचे जातभाई, परंतु त्यांनीं आपल्यांतील 'सांब' नांवाच्या एका यादवाला लटकाच स्त्रीवेष देऊन ऋषींपुढें उभा केला व 'ही गरोदर स्त्री आहे' असें खोटेंच सांगून हिला अपत्य काय होईल असें विचारलें; त्याबरोबर त्या अंतर्ज्ञानी मुनींनीं त्यांचें तें खोटें कर्म पाहून कोपानें शाप दिला व तो प्रत्ययास येऊन कोटों यादवांचा संहार होऊन कुलक्षय झाला. अशी धडधडीत गत इतिहासाची साक्ष आहे. याहून या इतिहासांनीं आमचे डोळे उघडावे तरी कसे ? आणि किती ? तथापि, आम्ही आपले निर्ढवतच चाललों आहों. मला वाटतें आम्ही देवालाच मठ्ठ बसविण्याची वेळ आणली आहे. हरहर ! हें बरें नव्हे, निदान भारतीयांना तरी हें हितकर नाहीं. करितां त्यांनीं मागें पहावें व धर्माची कांस धरावी; हाच त्यांचे उन्नतीचा एकच एक उपाय आहे.

असो; आज इतके दिवस भारतासारख्या महनीय ग्रंथाचा परिचय करून आमचे अल्पमतीला जो कांहीं त्यांतील सारभूत भाग वाटला त्यांतला कांहीं अंश आम्ही प्रेमभावानें व प्रांजलपणानें आमचे वाचकबंधूपुढें मांडिला आहे. तो रुचल्यास त्यांनीं घ्यावा. व अखिल भारतादि पुराणाचें सार म्हणून एकच वाक्य सतत मनांत वागवावें. तें वाक्य हेंच कीं, '**यतोधर्मस्ततोजयः**' आणि त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें.

आतां अखेर सर्व वाचकांचे वतीनें पुढील आशीर्वाद परमेश्वरापासून मागून घेऊन हा लेख संपवितों.

**सर्वेऽत्र सुखिनः संतु सर्वेसंतु निरामयाः ।**
**सर्वेभद्राणि पश्यंतु जीवंतु शरदांशतम् ॥**

**॥ इति शं ॥**

# शुद्धिपत्र.

—:०:—

## भविष्यपर्व.

| अध्याय | पान | रकाना | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| ७३ | ७४१ | २ | ८ | भागवत | भारत |

## COPY

C. A. Kincaid I. C. S. in his book named "The tale of the Tulsi Plant and other studies" speaks voluntarily of our company and our Translation of the Mahabharat in the following terms, in a footnote on page 12.

"I have not translated from the Sanskrit but from Messrs. Datar & Modak's admirable Marathi rendering. The book has been published at great expense by Messrs., Chiplunkar & Co., at the Indira press, Poona, and the second half of the rendering is delayed for want of funds. I would venture to appeal to the Marathi reading Public to assist by purchasing the parts already translated, in the publication of the second half"

---

## श्री.

मेहेरबान **सी. ए. किंकेड.** आय. सी. एस. यांनीं आपल्या 'दि टेल ऑफ दि तुळशी प्लँट अँड अदर स्टडीज' या पुस्तकांत **गणेश विष्णु चिपळुणकर** आणि **मंडळींच्या** महाभारताच्या भाषांतराची आपण होऊन खालीं दिल्याप्रमाणें तरफदारी केली आहे

"सदहू गोष्टींतील मजकूर मी मूळ संस्कृतांतून न घेतां रा. दातार व मोडक यांनीं केलेल्या अप्रतिम भाषांतरावरून घेतला आहे हें पुस्तक चिपळूणकर आणि मंडळीनें पुष्कळ द्रव्य खर्चीं घालून तयार केलें असून तें पुणें येथील इंदिरा छापखान्यांत छापिलें आहे परंतु द्रव्यसहाय्याच्या अभावीं सदर ग्रंथाचे पुढील भाग छापण्याचें काम लांबणीवर पडलें आहे. तरी मराठी भाषेंतील वाचकांना माझी अशी शिफारस आहे कीं त्यांनीं आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या भागांना आश्रय देऊन पुढील प्रकाशनाच्या कामीं अवश्य मदत करावी"

वरील अभिप्राय मि. किंकेड साहेबांनीं लिहिला त्यावेळीं महाभारताचे फक्त चारच भाग प्रसिद्ध झाले होते परंतु आतां जरी सर्व काम पूर्ण झालें आहे तरी या कामीं झालेल्या अवाढव्य कर्जाचा विचार करून महाराष्ट्रभाषाभिमानी वाचकांनीं ग्रंथाच्या प्रती विकत घेऊन मदत करणें अत्यंत जरूर आहे

प्रकाशक